**मुख्य महानगर दंडाधिकारी, दादर, मुंबई येथील न्यायालयासाठी परेल- भोईवाडा, क्रॉस रोड, मनपा शाळा (तळमजला + ५ मजले) भाडेतत्वावर घेण्याकरीता प्रशासकीय मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. न्याइमा-१११९/८३०/प्र.क्र.१७९/कार्यासन११**
पाचवा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ८ नोव्हेंबर, २०२१

<u>वाचा</u>:-१.मा.उच्च न्यायालयाचे पत्र क्र.B(W) ६०४२/१९७६/(२४ Part-II)/२३७६, दि.२३/१०/२०१९ व क्र.B(W)६०४२ १९७६/(२४ Part-II)/९६७/१९३७८, दि.२१/८/२०२१
२. मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांचे पत्र क्र.५५४६/२०१९, दि.१५/१०/२०१९, क्र.१७३३/२०१९, दि.३/१२/२०१९, क्र.८८८/२०२१, दि.३/४/२०२१ व क्र.१३१६/२०२१, दि.४/ ८/ २०२१

**<u>प्रस्तावना:-</u>**

दादर, भोईवाडा, मुंबई येथे नवीन न्यायालय इमारत ( तळमजला +१२ मजले) बांधण्याकरीता दि.७/९/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर इमारत बांधून होईपर्यंत परेल भोईवाडा येथील बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या शाळेची इमारत भाडेतत्वावर घेण्याचे आदेश मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट पिटीशन क्रमांक २९९१/२०१४ मध्ये दि.२४/४/२०१९ रोजी दिले आहेत. त्यानुसार परेल भोईवाडा येथील बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या शाळेची इमारत भाडेतत्वावर घेण्याकरीता तसेच सदर इमारतीमध्ये स्थापत्य व विद्युत कामे करुन घेण्यासाठी प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्धतेसाठी मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचेमार्फत संदर्भ क्र.२ येथील पत्रांन्वये प्रस्ताव सादर करण्यात आला होता. त्यानुसार बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या शाळेची इमारत भाडेतत्वावर घेण्यास मान्यता देण्याबाबत तसेच त्या अनुषंगाने त्या इमारतीमध्ये स्थापत्य व विद्युत कामे करुन घेण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

परेल भोईवाडा, क्रॉस रोड, बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या शाळेची इमारत (तळमजला + ५ मजले) मुख्य महानगर दंडाधिकारी, दादर, मुंबई यांना ३ वर्षांसाठी भाडेतत्वावर उपलब्ध करुन देण्यास तसेच त्यासाठी आवश्यक असणाऱ्या खर्चास यासंदर्भातील भाडेकरारनामा अंमलात येईल त्या दिनांकापासून या आदेशाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**आवर्ती खर्च :**

भाडे - वार्षिक खर्च रु.२,१६,०२,८९२/- (अक्षरी रुपये दोन कोटी सोळा लाख दोन हजार आठशे ब्याण्णव फक्त) (रु.१८,००,२४१/- प्रतिमहा )

मालमत्ता कर - रु.१,००,०००/- प्रतिवर्ष

वीज बिल - अंदाजे रु.२०,०००/- प्रतिमाह - रु.२,४०,०००/- प्रतिवर्ष

पाणी बिल - अंदाजे रु.१५,०००/- प्रतिमाह -रु.१,८०,०००/- प्रतिवर्ष

दूरध्वनी बिल - अंदाजे रु.२,०००/- प्रतिमाह -रु.२४,०००/- प्रतिवर्ष

**अनावर्ती खर्च :**

स्थापत्य काम - रु.१,३४,४८,६५६/-

( सदर शाळेच्या इमारतीमध्ये काही फेरफार करुन न्यायालय हॉल तयार करणे, न्यायालयीन कर्मचारीवृंदासाठी बसण्याची व्यवस्था करणे, प्रसाधनगृहाचे नुतनीकरण करणे अशा प्रकारची स्थापत्य कामे करण्यासाठी )

विद्युत कामे - रु.३०,७५,७२८/-

अनामत रक्कम - रु.५०,००,०००/-

भाडेकरारनामा नोंदणी खर्च अंदाजे रु.२,५०,०००/-

२. उपरोल्लेखित भाडेदरात प्रतिवर्षी १०% वाढ होईल, असे बृहन्मुंबई महानगरपालिका यांनी प्रस्तावित केले आहे. या प्रस्तावित भाडेवाढीस व त्यापोटी येणाऱ्या खर्चास देखील मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. प्रस्तावांतर्गत जागा भाडेतत्वावर घेण्यासाठी बृहन्मुंबई महानगरपालिका यांच्याशी भाडेकरारनामा करण्याची कार्यवाही मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांनी तात्काळ करावी.

४. यासाठी होणारा खर्च " मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान,(००) १०७ इलाखा शहर दंडाधिकारी न्यायालये, (००), (००) (०१) इलाखा शहर दंडाधिकारी न्यायालये (अनिवार्य) (२०१४ ०२३४) १३- कार्यालयीन खर्च, ०६-दूरध्वनी, वीज, पाणी शुल्क, १४- भाडे आणि मालमत्ता कर, २७- लहान बांधकामे या उद्दिष्टाखाली टाकण्यात यावा. याकरीता लागणारा निधी विहित पध्दतीने उपलब्ध करुन घेऊन भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.९३३/२०२१/व्यय ५, दि.२०/१०/२०२१ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने तसेच वित्त विभाग, शा.नि. क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२ दि. १७/४/२०१५ , वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उप विभाग-एक अ.क्र.१० , नियम क्र. ११५ मधील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११०८१७१८१०१९१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a80fef4908844f3f0e391754221ba7b421d28c86653344150a5e31030c791f4b, pseudonym=A05C54A04D3293F61521D5E463E799884D63F286, serialNumber=7328C41D6A5210C49CCE931861626D508AE4537D7BB43F92AC6D5796595AADB8, cn=HEMANGI AJIT SHETYE
Date: 2021.11.08 17:22:00 +05'30'

( हेमांगी शेट्ये )

**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

१) प्रबंधक (निरीक्षणे-२),उच्च न्यायालय, मुंबई.

२) मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई.

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा) महाराष्ट्र, मुंबई.

४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

५) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

६) वित्त विभाग, कार्यासन-व्यय ५/ अर्थ-११, मंत्रालय, मुंबई.

७) विधि व न्याय विभाग, कार्या- २३ व २४, मंत्रालय,मुंबई.

८) निवडनस्ती (कार्यासन ११)